सदस्य (प्रशासकीय/तांत्रिक), महाराष्ट्र स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरण या पदावर नियुक्तीबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रेरा-२०२३/ प्र.क्र.५६/दुवपु-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १३ जून, २०२४

**वाचा -**

१) केंद्र शासनाचा स्थावर संपदा (विनियमन व विकास) अधिनियम, २०१६.
२) महाराष्ट्र स्थावर संपदा अपील न्यायाधिकरण (अधिकारी व कर्मचारी) (नियुक्ती व सेवाशर्ती) नियम, २०१७, दि. २० एप्रिल, २०१७.
३) गृहनिर्माण विभाग, शासन अधिसुचना क्रमांकः संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१२९ (भाग-१) /दुवपु-२ दिनांक २४ ऑक्टोबर, २०१९
४) गृहनिर्माण विभाग ,शासन निर्णय क्र. स्थासंअ- २०१७/ प्र.क्र.१२५/दुवपु-२ दिनांक ०८ मे, २०१८
५) गृहनिर्माण विभाग, शासन निर्णय क्र. रेरा-२०१८/प्र.क्र.२०३/दुवपु-२, दिनांक १३ जून २०१८

**प्रस्तावना -**

केंद्र शासनाने स्थावर संपदा (विनियमन व विकास) अधिनियम, २०१६, दि. २६.०३.२०१६ रोजी अधिसूचित केला आहे. उक्त अधिनियमाच्या कलम ४३ नुसार प्राप्त अधिकाराचा वापर करून शासनाने संदर्भ क्र.३ येथील दिनांक २४ ऑक्टोबर २०१९ रोजीच्या अधिसूचनेन्वये महाराष्ट्र राज्यासाठी महाराष्ट्र स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरणाची स्थापना केली आहे. सदर न्यायाधिकरणावरील सदस्य (प्रशासकीय/तांत्रिक) महाराष्ट्र स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरण या पदावर संदर्भ क्र. ४ नुसार श्री.एस.एस.संधू यांची नियुक्ती करण्यात आली होती व त्यांचा उक्त पदावरील कार्यकाल दिनांक ०८.०७.२०२३ रोजी संपुष्टात आला आहे. यास्तव सदर रिक्त होणाऱ्या पदावर पात्र व्यक्तीची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती :

**शासन निर्णय -**

स्थावर संपदा (विनियमन व विकास) अधिनियम, २०१६ च्या कलम ४६ (३) द्वारे प्रदान करण्यात आलेल्या व त्याबाबतीत त्यास समर्थ करणाऱ्या इतर सर्व अधिकारांचा वापर करून गठित केलेल्या निवड समितीने शिफारस केल्यानुसार शासन याद्वारे, सदस्य (प्रशासकीय/तांत्रिक) महाराष्ट्र स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरण, मुंबई या पदावर भारतीय प्रशासकीय सेवेतील सेवानिवृत्त अधिकारी श्री.श्रीकांत देशपांडे यांची नियुक्ती ते कार्यभार स्वीकारतील त्या तारखेपासून करीत आहे.

सदर पदाचा कार्यभार स्विकारल्यानंतर त्यांच्या नियुक्तीस स्थावर संपदा (विनियमन व विकास) अधिनियम, २०१६ व महाराष्ट्र स्थावर संपदा अपील न्यायाधिकरण (अधिकारी व कर्मचारी) (नियुक्ती व सेवाशर्ती) नियम, २०१७ मधील तरतूदी लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०२४०६१३१४५८२१०४०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJIT MALHARI KAWADE

Digitally signed by AJIT MALHARI KAWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT, 2.5.4.20=597d3c4c02c1add96119d79fc4b21063ef289863535a77211cf42daa12e539dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=49349D578C976E0D05A9793EF412604378BDF9FED13D605CABA002427A7C370B, cn=AJIT MALHARI KAWADE
Date: 2024.06.13 15:12:20 +05'30'

**(अजित कवडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३. मा. मंत्री (गृहनिर्माण) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई.
५. अध्यक्ष/प्रबंधक, स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरण, कालाघोडा, मुंबई-०१.
६. श्री.श्रीकांत देशपांडे, ४०२, निलांबरी बिल्डींग, जनरल जगन्नाथ भोसले मार्ग, निरीमन पॉईंट अग्निशामक दलाच्या समोर, कुलाबा, मुंबई.
७. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८. प्रधान महालेखाकार -१ यांचे कार्यालय, प्रतिष्ठा भवन, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०.अतिरिक्त मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग यांना त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयाच्या निदर्शनास आणण्याच्या विनंतीसह.
११.उप सचिव, गृहनिर्माण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२.सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३.निवडनस्ती-दुवपु-२.